**प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरण स्थापन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२४/प्र.क्र.७१/सां.का.३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १९ जुलै, २०२४.

**वाचा:-** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.टिडीएम-२०१७/१०/प्र.क्र.९८४/पर्यटन, दिनांक २०.१२.२०१७

२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.राकिप-२०१८/ प्र.क्र.१११/सां.का.३, दिनांक १६.१०.२०१८.

३) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र.तिक्षेवि-२०२४/ प्र.क्र.१६/१४४४अ, दिनांक ०५.०३.२०२४.

**<u>प्रस्तावना</u> :-**

रायगडावरील शिवराज्याभिषेक सोहळा भाषणामध्ये मा. मुख्यमंत्री महोदयांनी रायगड किल्ला विकास प्राधिकरणाच्या धर्तीवर प्रतापगड किल्ल्याच्या सर्वांगीण विकासासाठी प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरण स्थापन करण्यात येईल, अशी घोषणा केली आहे.

०२. प्रतापगड किल्ला सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर तालुक्यात असून मौजे रानआडवागौड येथे आहे. छत्रपती शिवाजी महाराजांच्या आज्ञेनुसार मोरोपंत पिंगळे यांच्या देखरेखीखाली प्रतापगडाचे बांधकाम इ.स. १६५६ मध्ये पार पडले. छत्रपती शिवाजी महाराजांनी आदिलशाही सरदार अफजलखान याचा वध दि.१० नोव्हेंबर, १६५९ साली याच किल्ल्याच्या पायथ्याशी मोठ्या शिताफीने केला होता.

०३. महाराष्ट्रातील मराठा लष्करी वास्तु स्थापत्याचे उत्कृष्ट वैश्विक मूल्य (Outstanding Universal Value) असलेल्या १२ किल्ल्यांचे जागतिक वारसा नामांकन मिळण्यासाठी भारत सरकारकडून युनेस्कोला प्रस्ताव पाठविण्यात आलेला आहे. प्रतापगड किल्ल्याचा या नामांकनाच्या प्रस्तावामध्ये समावेश आहे.

०४. रायगड किल्ल्यासाठी यापूर्वी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार रायगड किल्ला व परिसर पर्यटन विकास आराखडा प्राधिकरण स्थापन करण्यात आले आहे. मा.मुख्यमंत्री महोदयांनी केलेल्या घोषणेच्या अनुषंगाने श्रीमंत छत्रपती उदयनराजे भोसले, मा.संसद सदस्य यांच्या अध्यक्षतेखाली प्रतापगड किल्ल्यासाठी स्वतंत्र प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरण स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-**

प्रतापगड किल्ल्याच्या सर्वांगीण विकासासाठी श्रीमंत छत्रपती उदयनराजे भोसले, मा.संसद सदस्य यांच्या अध्यक्षतेखाली **"प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरण"** स्थापना करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरणाची रचना खालीलप्रमाणे राहील:-

| अ.क्र. | पदाधिकारी | पद |
|---|---|---|
| १ | श्रीमंत छत्रपती उदयनराजे भोसले, मा.संसद सदस्य | अध्यक्ष |
| २ | स्थानिक विधानसभा सदस्य | सदस्य |
| ३ | विभागीय आयुक्त, पुणे विभाग | सदस्य |
| ४ | व्यवस्थापकीय संचालक, पर्यटन विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| ५ | जिल्हाधिकारी, सातारा | सदस्य सचिव |
| ६ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद, सातारा | सदस्य |
| ७ | प्रादेशिक संचालक, भारतीय पुरातत्व सर्वेक्षण, पुणे | सदस्य |
| ८ | अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा | सदस्य |
| ९ | संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई | सदस्य |
| १० | विशेष निमंत्रित / तज्ञ सदस्य<br>१) श्री.नितीन शिंदे<br>२) श्री.मिलिंद एकबोटे<br>३) श्री. शरद पोंक्षे<br>४) श्री. सदाशिव टेटविलकर<br>५) श्री. सोमनाथ धुमाळ<br>६) श्री. चंद्रकांत पाटील<br>७) श्री. पंकज चव्हाण<br>८) श्री. अमोल जाधव | सदस्य |

**०३. प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरणाची कार्यकक्षा व अधिकार कक्षा खालीलप्रमाणे असेल :-**

i. प्रतापगड किल्ला जतन व संवर्धन आराखड्यातील शासनाने मंजूर केलेल्या कामांच्या अंदाजपत्रकांना व नकाशांना मान्यता देणे.

ii. प्राप्त निधी /आर्थिक स्त्रोताचे वाटप करणे.

iii. प्रतापगड किल्ला विकासाच्या मान्यता दिलेल्या आराखड्याप्रमाणे सदरील आराखड्यांतर्गत निधीचे पुनर्वाटप व पुनर्रचना करणे.

iv. प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरणाच्या कामांच्या प्रगतीचे संनियंत्रण करणे.

v. प्रकल्पांतर्गत निर्माण केलेले विविध घटक कार्यान्वित करणे.

**०४. प्रतापगड प्राधिकरणाची बैठक:-**

i. प्राधिकरणाची दर महिन्याला बैठक आयोजित करण्यात येईल. अशी नियमित बैठक आयोजित करणे शक्य न झाल्यास चक्रीय पद्धतीने मान्यता घेवून निर्णय घेण्यात येईल.

ii. प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरणास आवश्यकता असल्यास संबंधित अधिकारी किंवा तज्ञ यांना बैठकीस विशेष निमंत्रित (special invitee) करता येईल .

**०५.** प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरण अंतर्गत विविध कामांच्या अंमलबजावणी करीता खालील प्रकारचा प्रकल्प नियोजन, मुल्यमापन संनियंत्रण कक्ष स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

(I) प्रकल्प नियोजन, मुल्यमापन संनियंत्रण कक्षाची रचना:-

| अ.क्र. | पदाचे नाव | पदांची संख्या |
|---|---|---|
| अ) | भारतीय पुरातत्व विभागातील निवृत्त तज्ञ | कमाल ६ |
| ब) | विशेष तज्ञ अधिकारी | |
| १ | सल्लागार सदस्य (पुरातत्वशास्त्र) | १ |
| २ | सल्लागार सदस्य (बांधकाम वारसा) | १ |
| ३ | सल्लागार सदस्य (मध्ययुगीन इतिहास) | १ |
| क) | अन्य कर्मचारीवृंद | |
| १ | संवर्धन वास्तुविशारद | १ |
| २ | स्थापत्य अभियंता/पुरातत्वशास्त्र अभियंता | १ |
| ३ | तांत्रिक समन्वयक | १ |
| ४ | विशेष कार्य अधिकारी | १ |
| ५ | प्राधिकरणाच्या अध्यक्षांसाठी स्वीय सहायक | १ |
| ६ | शिपाई | १ |
| | **एकूण** | **१५** |

(II) सदर कक्षाकरीता वरील विवरणपत्रातील "अ" व "ब" येथील तज्ञ सल्लागारांच्या सेवा प्रथम एका वर्षासाठी घेण्यास प्राधिकरणास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. प्रकल्पाचे स्वरुप व सदर सल्लागार/ तज्ञ व्यक्तींचा त्या क्षेत्रातील अनुभव व ज्येष्ठता विचारात घेऊन, शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक- खाक्षेस- २०१५/प्र.क्र. २०९/ रस्ते-९अ, दि. २४.०१.२०१७ मधील प्रतिदिन मानधन दराच्या मर्यादेत राहून एक वर्षासाठी त्यांच्यासोबत करार करण्यात यावा. या तज्ञांना द्यावयाचे मानधन हे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या उपर्निर्दिष्ट शासन निर्णयातील तरतूदीनुसार सेवाकर/ नैमित्तिक खर्च वगळून असेल.

(III) प्रकल्प नियोजन, मुल्यमापन व संनियंत्रण कक्षासाठी आवश्यक असलेला इतर कर्मचारीवृंद जसे, विशेष कार्य अधिकारी / स्वीय सहायक / शिपाई हे कर्मचारी थेट कंत्राटी स्वरुपात न भरता जिल्हाधिकारी, सातारा तथा सदस्य सचिव, प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरण यांनी आराखड्याशी संबंधित कार्यालयांतील कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावेत अथवा अशा पध्दतीने पुरेसे कर्मचारी उपलब्ध न झाल्यास सदर कार्यालयांनी कंत्राट तत्वावर घेतलेल्या कर्मचाऱ्यांमधून अशा कर्मचाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन द्याव्यात.

(IV) प्राधिकरणाच्या कामांसंदर्भात प्रासंगिक स्वरुपात कराव्या लागणाऱ्या दौऱ्यासाठी प्राधिकरणाच्या अध्यक्ष व सदस्यांकरीता २ डी. व्ही. वाहने जिल्हाधिकारी, सातारा यांनी उपलब्ध करुन द्यावीत. डी.व्ही. वाहने उपलब्ध न होण्याच्या प्रसंगी वाहने प्रासंगिक स्वरुपात भाडेतत्वावर घेऊन जिल्हाधिकारी, सातारा यांनी त्यांच्यास्तरावर याबाबत व्यवस्था करावी.

(V) प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरणांतर्गत प्रकल्प नियोजन, मुल्यमापन व संनियंत्रण कक्षाकरीता होणारा खर्च सदर आराखड्यांतर्गत आकस्मिक निधीतून करण्यात यावा.

०६. **<u>प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरणासाठी निधी उपलब्ध करुन देणे:-</u>**

i. नियोजन विभागामार्फत मंजुर होणारा आराखडा, जिल्हा नियोजन समिती इत्यादी माध्यमातून प्राधिकरणासाठी निधी उपलब्ध होईल.

ii. नियोजन विभागाने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयानुसार सातारा जिल्ह्यातील पश्चिम घाट परिसरातील धार्मिक, ऐतिहासिक व निसर्ग पर्यटन स्थळे विकासाचा एकात्मिक पर्यटन विकास आराखडा अंतर्गत रु.३८१.५६ कोटी रक्कमेच्या आराखड्यास मंजुरी दिलेली आहे. यामध्ये प्रतापगड किल्ला जतन व संवर्धनासाठी रु.१२७.१५ कोटी इतका निधी मंजुर करण्यात आलेला आहे. सांस्कृतिक कार्य विभाग या एकत्रित आराखड्यातील केवळ प्रतापगड किल्ला जतन व संवर्धनाचा विषय "प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरणामार्फत" हाताळेल. प्रतापगड किल्ला जतन व संवर्धनासाठीचा रु.१२७,१५,००,०००/- ( अक्षरी रुपये एकशे सत्तावीस कोटी पंधरा लक्ष फक्त) इतका निधी प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरणाकडे वर्ग करण्यात यावा.

**०७.** नियोजन विभागामार्फत मंजुर झालेल्या आराखड्याबाबत नियोजन विभागाच्या दि.०४.०६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित जिल्हास्तरीय समिती (मा.पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील) आणि जिल्हास्तरीय कार्यकारी समिती (जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली) मार्फत कामकाज केले जाते. या दोन्ही समित्यांमार्फत सातारा जिल्ह्यातील पश्चिम घाट परिसरातील धार्मिक, ऐतिहासिक व निसर्ग पर्यटन स्थळे विकासाचा एकात्मिक पर्यटन विकास आराखड्यातील प्रतापगड किल्ला व जतन व संवर्धन संबंधातील कामे वगळून इतर कामांचे कामकाज पाहिले जाईल. या दोन्ही समित्यांचे प्रतापगड किल्ला जतन व संवर्धन संबधातील कामकाज प्रतापगड किल्ला विकास प्राधिकरण पाहील.

०८. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौप.सं.क्र.१०/२०२४/१४४४-अ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ अनौप.सं.क्र.२११/२०२४/व्यय-१५, दि.०७.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१९१०५६०१००२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2024.07.19 11:41:37 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विधानपरिषद सभापती, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधिमंडळ, मुंबई.
६. मा. विधानसभा अध्यक्ष, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधिमंडळ, मुंबई.
७. मा. विरोधीपक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.
८. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. श्रीमंत छत्रपती उदयनराजे भोसले, मा.संसद सदस्य.
१०. मा. स्थानिक विधानसभा सदस्य (संचालक, पुरावत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांच्या मार्फतीने)
११. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. विभागीय आयुक्त, पुणे विभाग
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१५. जिल्हाधिकारी, सातारा.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
१७. प्रादेशिक संचालक, भारतीय पुरातत्व सर्वेक्षण, पुणे
१८. उप सचिव (सां.का. ३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा
२०.संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई.
२१.विशेष निमंत्रित/तज्ञ व्यक्ती (संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत)
२२.सहायक संचालक, पुरातत्व विभाग, पुणे.
२३.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२४.महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२५.महालेखापाल-१, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२६.महालेखापाल-२, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२७.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२८. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
२९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३०.निवड नस्ती, सां.का.३.